राज्य योजनेंतर्गत सन २०१८-१९ शासकीय अभिकरणाकडून समुपयोजनासाठी (जळाऊ लाकूड व दगडी कोळसा) (२४०६ ०४८१) अनुदान वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्र.संकिर्ण-२०१८/प्र.क्र.३६३/फ-९**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**
**दिनांक :- ०६ ऑक्टोबर, २०१८**

वाचा :-

१. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक ०२ एप्रिल, २०१८
२. विभागीय वन अधिकारी (योजना) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे कार्यालयाचे क्र.कक्ष १/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.२४/११३८/२०१८-१९, दिनांक २८.०९.२०१८

प्रस्तावना :-

राज्य योजना सन २०१८-१९ पासून शासकीय अभिकरणाकडून समुपयोजन (जळाऊ लाकूड व दगडी कोळसा) (२४०६ ०४८१) या लेखाशिर्षाखाली रू. ७००.०० लक्ष इतका नियतव्यय मंजूर व अर्थसंकल्पीत आहे. वित्त विभागाच्या दिनांक ०२.०४.२०१८ रोजीच्या परिपत्रकान्वये सन २०१८-१९ करिता महसूली शिर्षांतर्गत एप्रिल ते डिसेंबर या ९ महिन्यांच्या कालावधीकरिता ७०% च्या मर्यादेत अर्थसंकल्पीय प्रणालीवर निधी वितरीत करण्याकरिता उपलब्ध करुन देण्यात आला आहे.

सदर योजनेअंतर्गत अर्थसंकल्पित असलेल्या नियतव्ययाच्या अनुषंगाने विभागीय वन अधिकारी (योजना) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे कार्यालयाकडून संदर्भ क्र.२ अन्वये मुख्य वनसंरक्षक (प्रा.) यवतमाळ यांचेकडील प्रस्तावित कामाकरीता रु.१९.५५ लक्षचा व मुख्य वनसंरक्षक (प्रा.) अमरावती यांचेकडील प्रस्तावित कामाकरीता रु.११.७४ लक्षचा अशा एकूण रु.३१.२९ लक्ष रकमेच्या नवीन बाब प्रस्तावास शासन मंजूरी प्रदान करुन अनुदान उपलब्ध करुन देण्याकरीता विनंती केली आहे. त्यानुसार या कामासाठी अनुदान वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय:-**

वार्षिक योजना सन २०१८-१९ मध्ये शासकीय अभिकरणाकडून समुपयोजन (जळाऊ लाकूड व दगडी कोळसा) (२४०६ ०४८१) या योजनेकरीता मंजूर व अर्थसंकल्पित नियतव्ययाच्या अनुषंगाने या योजनेमधून मुख्य वनसंरक्षक (प्रा.) यवतमाळ व मुख्य वनसंरक्षक (प्रा.) अमरावती या वनवृत्तातील खालील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे प्रस्तावित कामांचा खर्च भागविण्याकरीता **रुपये ३१.२९ लक्ष** इतका निधी वितरीत करण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे:-

| अ.क्र. | वनवृत्त | प्रस्तावित रक्कम (रु.लाखात) |
|---|---|---|
| १ | यवतमाळ | १९.५५ |
| २ | अमरावती | ११.७४ |
| | **एकूण :-** | **३१.२९** |

उपरोक्त अनुदानाचा वापर करण्याच्या दृष्टीने (४४०६ ०४८१) या लेखाशिर्षा अंतर्गत विहीत केलेल्या अटी व शर्तींचे पालन करणे तसेच खालील अटींचे पालन करणे संबंधितावर बंधनकारक राहील.

१. सदर तरतूद खर्च करतांना वित्त विभागाने वेळो वेळी घालून दिलेल्या अटी व शर्तीचे पालन करावे.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सदर निधी या विभागाकडून मंजूर केलेल्या प्रस्तावातील क्षेत्र / कार्यक्रम / कामे यावरच खर्च होईल व कामाची द्विरुक्ती होणार नाही आणि मंजूर कामांव्यतिरिक्त कोणत्याही नवीन बाबीवर /नवीन क्षेत्रावर/ नवीन कामांवर खर्च करण्यात येणार नाही याची दक्षता घ्यावी.
३. सदरहू निधी वितरित करण्यापूर्वी प्रस्तावानुसार योजनेतील निश्चित केलेल्या सर्व कामांना सक्षम अधिका-यांची तांत्रिक व प्रशासकीय मंजूरी प्राप्त आहे याची खात्री अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी करुन घ्यावी.
४. सदरहू कामे करतांना वन (संवर्धन) कायदा १९८०, भारतीय वन अधिनियम, १९२७, वन्यजीव (संरक्षण) अधिनियम १९७२ मधील तरतुदींचा भंग होणार नाही तसेच सर्वोच्च न्यायालय/उच्च न्यायालय/केंद्र शासनाच्या व्याघ्र संवर्धन प्राधिकरण यांनी दिलेल्या मार्गदर्शक सुचना/आदेशांची अवहेलना होणार नाही याची सुध्दा दक्षता घ्यावी.
५. उपरोक्त खर्च विहीत कार्यपध्दतीनुसार तसेच अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध मासिक निधी प्रवाहानुसार खर्च करण्यात यावा. यामध्ये कोणतीही वित्तीय अनियमितता होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी. सदरहू रक्कम खर्ची पडल्यानंतर त्याचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे.
६. सर्व कामे दर्जेदार होतील याबाबत योग्य शासन कार्यप्रणालीचा वापर केला जाईल व कोणतीही अनियमितता होणार नाही याची सर्व जबाबदारी संबंधीत मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक) यवतमाळ व अमरावती यांची राहील.
७. शासन निर्णय दिनांक ०१ डिसेंबर, २०१६ नियम पुस्तिकेत नमुद केल्यानुसार तसेच उद्योग उर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय दिनांक २४ ऑगस्ट, २०१७ मध्ये नमूद गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस (GeM) पोर्टलची कार्यपध्दती नुसार निविदा प्रक्रियेत खरेदी किंमत रु.तीन लाख व त्यापेक्षा अधिक असल्यास ई-निविदा प्रणालीचा वापर करावा.

८. प्रत्यक्ष खर्च करण्यापूर्वी विहीत पध्दतीचे पालन करावे व आवश्यकतेनुसार आहरण करावे.
९. प्रस्तावित कामांमध्ये निसर्गपूरक असलेले साहित्याचा जास्तीत जास्त वापर करावा.
१०.सदर खर्च वित्त विभागाच्या दिनांक ०२.०४.२०१८ च्या परिपत्रकातील व त्यासोबतच्या परिशिष्टामध्ये नमूद केलेल्या अटीची पूर्तता होईल, याची दक्षता घेण्यात यावी.
११.सदर मंजूरीस शासन निर्णय क्रमांक एमएससी- २०११/प्र.क्र. १७८/फ-५, दिनांक ३०.९.२०११ च्या परिशिष्टात नमुद केलेल्या अटी व शर्ती बंधनकारक असतील.

उपरोक्त खर्च मागणी क्रमांक सी-७, प्रधान शिर्ष २४०६, वनीकरणे व वन्यजीवन, (०१)(०४), शासकिय अभिकरणाकडून समुपयोजन (जळाऊ लाकूड व दगडी कोळसा) (२४०६ ०४८१) या लेखाशिर्षाखाली सन २०१८-१९ करिता उपलब्ध होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या दिनांक ०२.०४.२०१८ च्या परिपत्रकान्वये तसेच वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनिमय, भाग-२, दिनांक १७.४.२०१५ मधील भाग पहिला, उपविभाग-३, परिच्छेद २७ (२) अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१००८१४२१११९८१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sujay Dodal

Digitally signed by Sujay Dodal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=353112ee0fa47f9ff9bedae88f651d09fdb142df5fbce9c004f7eea06d8b9baf, cn=Sujay Dodal
Date: 2018.10.08 14:26:41 +05'30'

**(सुजय दोडल)**
सह सचिव (वने)
महसूल व वन विभाग

**प्रत :-**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प,नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर
३. विभागीय वन अधिकारी (योजना) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
४. मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), यवतमाळ/अमरावती
५. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
६. वित्त विभाग, व्यय-१० कार्यासन, मंत्रालय, मुंबई-३२.
७. नियोजन विभाग (का-१४७५), मंत्रालय, मुंबई-३२.
८. फ-२/ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
९. कार्यासन फ-९, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.(निवडनस्ती)